**उद्योग घटकास “सहाय्यक उपक्रम” म्हणून**
**घोषित करणेबाबतची कार्यपध्दती**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

शासन परिपत्रक क्र: बीआरयू-१६१४/प्र.क्र.९०/१४/उद्योग-१०
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २० नोव्हेंबर, २०१४

**परिपत्रक**

मुंबई सहायक उपक्रम (खास उपबंध) अधिनियम, १९५८ नुसार उद्योग घटकांना सहाय्यक उपक्रम म्हणून घोषित करणेबाबतचे विविध प्रस्ताव शासनास प्राप्त होत असतात. सदर प्रस्ताव या विभागाकडून सोबतच्या २१ मुद्यांबाबतच्या प्रश्नावलीनुसार तपासण्यात येत होते. तथापि, काही मुद्यांबाबत घटकाकडून योग्य माहिती दिली जात नसल्याचे निदर्शनास आले आहे.

२. उद्योग घटकांशी संबंधित सिका ॲक्ट व बीआयएफआर संदर्भातील बाबी उद्योग संचालनालयाकडून हाताळण्यात येतात. त्यामुळे प्राप्त होणाऱ्या प्रस्तावानुसार संबंधित उद्योग घटकांबाबतची माहिती/ स्थिती उद्योग संचालनालयास अवगत असते. त्यानुसार दिनांक १.१.२०१५ पासून वरील अधिनियमानुसार एखाद्या घटकास “सहाय्यक उपक्रम” म्हणून ज्या घोषित करावयाचे असल्यास असे प्रस्ताव तपासणी/छाननीसाठी उद्योग संचालनालयाकडे पाठविण्यात येतील. उद्योग संचालनालय, संबंधित उद्योग घटकास “सहाय्यक उपक्रम” म्हणून घोषित करण्याच्या अनुषंगाने सोबतची प्रश्नावली, घटकाचे ज्या बँका/वित्तीय संस्थांचे कर्ज थकित असेल त्या वित्तीय संस्थेचा अहवाल मागवून तसेच संचालनालयाला आवश्यक वाटतील अशा बाबी विचारात घेऊन त्यांच्या अधिपत्याखालील यंत्रणेमार्फत प्रस्तावाची छाननी करेल. प्रस्तावाची छाननी करुन संबंधित उद्योग घटकाला सहाय्यक उपक्रम म्हणून घोषित करणे योग्य होईल किंवा नाही याबाबत उद्योग संचालनालय शासनाला स्वयंस्पष्ट शिफारस करील.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर www.maharashtra.gov.in उपलब्ध करुन देण्यात आले असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २०१४११२०१२३३४११८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल याचे आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2014.11.20 12:42:28 +05'30'

**(संजय देगांवकर )**
उप सचिव.

सोबत - २१ मुद्यांबाबतची प्रश्नावली.

**प्रत,**

१. विकास आयुक्त, (उद्योग ) उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन इमारत, मंत्रालयासमोर,मुंबई ४०० ०३२.
२. सह संचालक ,(उद्योग), उद्योग संचालनालय,नवीन प्रशासन इमारत, मंत्रालयासमोर,मुंबई ४०० ०३२.
३. सर्व विभागीय सह/उप संचालक, सर्व महसूली विभाग
४. सर्व जिल्हा उद्योग अधिकारी, जिल्हा उद्योग केंद्र.

**बीआरयू कायद्यान्वये "सहाय्यक उपक्रम " म्हणून**
**घोषित करण्यासंदर्भात सादर करावयाची प्रश्नावली**

१. औद्योगिक घटक ज्या नावाने कार्यरत आहे त्या कंपनीबाबत संक्षिप्त माहितीसह कंपनी स्थापन झाल्याचा दिनांक, कंपनी टेक ओव्हर केली असल्यास पूर्वीच्या कंपनीचे नाव व स्थापनेचा दिनांक इत्यादि माहिती.

२. कंपनी कायद्यानुसार सहयोगी कंपनी असल्यास त्याविषयी माहिती.

३. औद्योगिक घटकांची पूर्ण उत्पादन क्षमता सुरु आहे का? उत्पादनाबाबत घटकाची सद्य:परिस्थिती.

४. औद्योगिक घटकाला बीआयएफआर किंवा उद्योग संचालनालयाकडून "आजारी उद्योग" म्हणून घोषित करण्यात आले आहे काय? असल्यास प्रमाणपत्राची प्रत.

५. "आजारी उद्योग "घोषित नसल्यास, सद्य:स्थितीत बीआयएफआरकडे किंवा उद्योग संचालनालयाकडे "आजारी उद्योग " घोषित करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला किंवा कसे?

६. कामगारांची संख्या किती आहे ? कामगारांना नियमित वेतन देण्यात येते का ? असल्यास वेतनापोटी येणारा वार्षिक खर्च किती ?

७. कामगारांच्या देणी संदर्भातील थकबाकी आहे काय ? असल्यास त्यासंदर्भात कामगारांनी तक्रार वा कामगार कायद्यानुसार दावा दाखल केला आहे काय ? त्या बाबतची सविस्तर माहिती, कामगार आयुक्त कार्यालय अथवा त्यांचे विभागीय कार्यालयाकडून प्राप्त झालेली असावी.

८. बँक/ वित्तीय संस्थांनी शुश्रुषा कार्यक्रम देण्याचे मान्य केले आहे का ? असल्यास त्याचा तपशील.

९. घटकाचा प्रस्ताव औद्योगिक व वित्तीय फेररचना मंडळाकडे ( बीआयएफआर) पाठविण्यात आलेला आहे काय ? असल्यास त्यामध्ये राज्य शासनाकडून अपेक्षित केलेल्या सवलतीची माहिती तसेच बीआयएफआरने प्रस्ताव मान्य केलेला असल्यास त्याची प्रत.

१०.पुनरुज्जीवनाच्या योजनेत प्रस्तावित नफा तोटा पत्रकात सुरक्षित आणि असुरक्षित धनकोची देणी परत करण्याची जी योजना असेल त्याची प्रत.

११.कंपनीकडे एकूण किती देणी आहेत ? त्यामध्ये असुरक्षित धनकोची आणि सुरक्षित धनकोची किती आणि केव्हापासूनची देणी थकित आहेत त्यांची बँक / वित्तीय संस्था / धनको यांच्या पत्रव्यवहाराच्या पत्यासह सविस्तर माहिती उदा. मूळ कर्ज, व्याज,दंडनीय व्याज इ. तसेच लघु उद्योजकांची देणी थकित आहेत का ? असल्यास त्याची सविस्तर माहिती.

१२.घटकाची एकूण मालमत्ता किती आणि कोणत्या ठिकाणी आहे, त्याची सविस्तर माहिती उदा. इमारत, यंत्रसामग्री इत्यादि. (Asset Value )

१३.बी.आर.यु. संरक्षण देणेबाबत धनकोकडून ना हरकत प्रमाणपत्र मिळविणे शक्य आहे किंवा कसे याबाबत खुलासा.

१४.मागील तीन वर्षाचे नफा व तोटापत्रक सादर करावे. तोटा झाला असल्यास तोटा होण्याची कारणे काय आहेत नफा झाला असल्यास त्याचा विनियोग कशा प्रकारे करण्यात आला ?

१५.कंपनीविरुध्द किती धनकोनी न्यायालयात दावे दाखल केले आहेत ? कंपनीविरुध्द दाखल करण्यात आलेल्या न्यायालयीन प्रकरणाची सविस्तर माहिती व सद्य:स्थिती.

१६.विक्रीकर प्रोत्साहन योजनेखाली घटकास कर्ज अथवा सहाय्य दिले आहे का ? असल्यास त्याचा तपशिल तसेच महाराष्ट्र शासनाचे कर्ज, हमी व वित्तीय सहाय्य यापैकी काही औद्योगिक घटकाकडे आहे का ?

१७.विक्रीकर विभागाकडील करांची थकबाकी आहे का ? असल्यास केव्हापासून ? असल्यास हप्त्याने विक्रीकर विभागाकडील करांची रक्कम भरण्यास सवलत मिळाली आहे का ?

१८. विजबिले थकीत आहे का? असल्यास किती आणि कधीपासून ?

१९.विक्रीकर आणि विज बिलाशिवाय राज्य शासनाची केंद्र शासनाची वैधानिक व इतर देणी याची माहिती दयावी. नसल्यास त्याबाबत स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

२०.बीआरयू कायद्यातील कलम ३ अन्वये संरक्षण मिळाल्यास आपला घटक पात्र आहे याबाबत स्पष्टीकरण करण्यात यावे.

२१.बीआरयू अधिनियमाखाली घटकास संरक्षणाची गरज का आहे ? त्याविषयी खुलासा करावा तसेच संरक्षण दिले नाही तर त्याचा घटकावर काय विपरित परिणाम होईल या विषयी खुलासा. या घटकाला यापूर्वी उक्त अधिनियमाद्वारे बीआरयू संरक्षण देण्यात आले होते काय? असल्यास एकंदरीत किती कालावधीसाठी ? संरक्षित कालावधीत घटकाने काय प्रगती केली ?